**गट “ड” ची पदे नामनिर्देशनाद्वारे भरताना मौखिक परिक्षा/मुलाखत न घेणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : प्रानिमं १२१५/(प्र.क्र.१०९/१५)/१३-अ,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ५ ऑक्टोबर, २०१५

**वाचा :**

(१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-२००४/प्र.क्र.१२/०४/बारा, दि.७ जून, २००४.

(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-२०१२/प्र.क्र.१२४/१२, दि.१२ मार्च, २०१३.

(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं १२१४/(प्र.क्र.४३/१४)/१३-अ, दि.५ जून, २०१४.

(४) मा.सचिव, भारत सरकार, Department of Personnel and Training Ministry of Personnel, Public Grievances and Pensions, North block, New Delhi-११०००१ यांचे दि.०४/०९/२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र.(१) येथील शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.७ जून, २००४ अन्वये, गट-ड ची रिक्त पदे नामनिर्देशनाने भरताना अवलंबावयाच्या कार्यपद्धतीबाबत सूचना दिलेल्या आहेत.

संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णयान्वये शासकीय विभाग/कार्यालयातील गट-ड मधील एखाद्या संवर्गातील पदभरती करताना, मुलाखती न घेता केवळ लेखी परीक्षेच्या आधारे निवडयादी तयार करुन त्याआधारे भरती करण्याचा निर्णय संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागास त्यांच्या स्तरावर घेता येईल, असे निदेश दिले आहेत.

संदर्भ क्र.(३) येथील शासन निर्णयान्वये, भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट-क वर्गीय आणि गट-ब (अराजपत्रित) पदे भरताना मौखिक परीक्षा न घेण्याबाबतचे आदेश देण्यात आले आहेत.

संदर्भ क्र.(४) येथील पत्रान्वये सचिव, Department of Personnel and Training Ministry of Personnel, Public Grievances and Pensions, भारत सरकार यांनी सूचित केले आहे की, राज्य शासनातील कनिष्ठ संवर्गातील गट-ब, गट-क व गट-ड ची पदे भरताना उमेदवारांची मुलाखत न घेता, लेखी परीक्षेतील गुणवत्तेच्या आधारे भरती प्रक्रिया रावबविण्याच्या कार्यपद्धतीचा अवलंब करण्यात यावा.

त्याअनुषंगाने गट-ड मधील पदे नामनिर्देशनाद्वारे भरतांना मौखिक परीक्षा न घेता लेखी परीक्षा घेऊन पदभरती करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-२०१२/प्र.क्र.१२४/१२, दि.१२ मार्च, २०१३ मधील "गट-ड मधील एखाद्या संवर्गातील पदभरती करताना, मुलाखती न घेता केवळ लेखी परीक्षेच्या आधारे निवडयादी तयार करुन त्याआधारे भरती करण्याचा निर्णय संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागास घेता येईल" ही तरतूद पुढीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे:-

"शासकीय कार्यालयांच्या कक्षेतील गट "ड" ची रिक्त पदे नामनिर्देशनाने भरतांना उमेदवारांची मौखिक परीक्षा (मुलाखत) न घेता केवळ लेखी परीक्षेमध्ये उमेदवारांनी प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे निवडसूची तयार करुन निवडसूचीतील पात्र उमेदवारांची गुणवत्तेनुसार निवड करण्यात यावी."

२. गट-ड मधील पदभरतीसंदर्भात, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-२००४/प्र.क्र.१२/०४/बारा, दि.७ जून, २००४ च्या पहिल्या परिच्छेदातील तरतूद पुढीलप्रमाणे आहे.-

"त्यासंदर्भात शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, यापुढे गट-ड ची रिक्त पदे नामनिर्देशनाने भरताना ७५% लेखी अथवा किमान शैक्षणिक पात्रतेच्या इयत्तेत/परिक्षेत उमेदवारांना मिळालेल्या गुणांद्वारे व २५% तोंडी गुणांद्वारे भरतीची प्रक्रिया करण्यात यावी."

सदर तरतूद पुढीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे.:-

"यापुढे गट "ड" ची पदे नामनिर्देशनाने भरतांना १०० गुणांची लेखी परीक्षा घेण्यात यावी. लेखी परीक्षेसाठी वस्तुनिष्ठ, बहुपर्यायी स्वरुपाचे ५० प्रश्न असावेत. सदर प्रश्न संबंधित पदाकरिता विहित करण्यात आलेल्या किमान शैक्षणिक अर्हतेच्या स्तरावरील असावेत. सदर लेखी परीक्षेमध्ये उमेदवारांनी प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे निवडसूची तयार करुन निवडसूचीतील पात्र उमेदवारांची गुणवत्तेनुसार निवड करण्यात यावी."

३. वरील परि.२ येथील सुधारित निदेश राज्य शासनाची सर्व कार्यालये, तसेच राज्य शासनाच्या नियंत्रणाखालील सार्वजनिक क्षेत्रातील सर्व उपक्रम, मंडळे, महामंडळे आणि स्थानिक स्वराज्य संस्थांना (उदा. ग्रामपंचायती, पंचायत समित्या, जिल्हा परिषदा, महानगरपालिका, नगरपरिषदा इत्यादिंना) लागू होतील.

४. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय दि.५ जून २०१४ अन्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेत नसलेली गट-क व गट-ब (अराजपत्रित) पदे सरळसेवेने भरताना मौखिक परीक्षा (मुलाखत) न घेण्याबाबत निर्गमित करण्यात आलेले निदेश राज्य शासनाच्या नियंत्रणाखालील

सार्वजनिक क्षेत्रातील सर्व उपक्रम, मंडळे, महामंडळे तसेच स्थानिक स्वराज्य संस्था (उदा. ग्रामपंचायती, पंचायत समित्या, जिल्हा परिषदा, महानगरपालिका, नगरपरिषदा इत्यादिंना) यांना देखील लागू होतील.

५. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी वरील सूचनांचे काटेकारेपणे पालन करावे. त्याचप्रमाणे, सदरहू सुधारित निदेश त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व क्षेत्रिय कार्यालये, सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम, मंडळे, महामंडळे तसेच स्थानिक स्वराज्य संस्था (उदा. ग्रामपंचायती, पंचायत समित्या, जिल्हा परिषदा, महानगरपालिका, नगरपरिषदा इत्यादि) यांच्या निदर्शनास आणून द्यावेत आणि या निदेशांचे त्यांच्याकडून काटेकोरपणे पालन केले जात आहे यावर संनियंत्रण ठेवावे.

६. ज्या प्रकरणी, हे आदेश निर्गमित होण्यापूर्वी जाहिरात प्रसिद्ध करुन निवड प्रक्रिया सुरु करण्यात आली आहे अशी प्रकरणे वगळता, हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००६१०५९१९९८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.10.06 10:59:50 +05'30'

**( डॉ.भगवान सहाय )**

**अपर मुख्य सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई,

३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई

४. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई,

५. सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,

६. मुख्य सचिव,

७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,

८. *प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई/नागपूर/औरंगाबाद,

९. *प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई/नागपूर/औरंगाबाद,

१०. *प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

११. *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद
१२. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१३. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
१४. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई,
१५. *राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१६. *सचिव, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१७. *महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई,
१८. *महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई,
१९. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर,
२०. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीकरिता ५ प्रती)
२२. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
२३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२५. मुख्य लेखापरीक्षक (निवासी लेखा), कोंकण भवन, नवी मुंबई,
२६. सर्व विभागीय आयुक्त,
२७. सर्व जिल्हाधिकारी,
२८. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२९. सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/ प्रादेशिक विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख (मंत्रालयीन विभागांमार्फत)
३०. मंत्रालय मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
३१. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
३२. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरॅक नं.१ योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई -२० (५ प्रती)
३३. इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई- २५ (५ प्रती
३४. नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई -२१ (५ प्रती)
३५. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई- १३ (५ प्रती)

३६. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई- २८ (५ प्रती)

३७. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई -१ (५ प्रती

३८. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस. व्ही.पटेल रोड, मुंबई- ४ (५ प्रती)

३९. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
त्यांनी हे आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.

४०. निवडनस्ती

*पत्राने